जात पडताळणी व दक्षता पथकाकडे

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती व दक्षता पथकाकडील अस्थायी पदे सन २०११-२०१२ या कालावधीकरीता पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देणेबाबत..

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांक : सकआ-२०११/२३३/प्र.क्र.(९६/११) /आस्था-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०११.

वाचा : १) शासन निर्णय, सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग क्र. सकआ-२०१०/प्र.क्र.१२६/आस्था-२, दिनांक १९.४.२०१०..
२) संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.सकसं/आस्था-६/जाप्रप/अस्थायी पदे/२०१०-११/२०११-१२/का-६/२१४ दिनांक ३१.१.२०११.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक :सकआ-२०१०/प्र.क्र.१२६/आस्था-२, दिनांक ९.४.२०१०. अन्वये संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडील १७९ पदांना व दक्षता पथकाकडील १०७ पदांना अशा एकूण २८६ अस्थायी पदांना दि.२८.२.२०११ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे..

२. सन २०११-१२ या वर्षात उपरोक्त प्रमाणे मुदतवाढ मंजूरी देण्यात आलेल्या पदांतील कोणत्याही पदात बदल अपेक्षीत नसल्याने, संचालनालयाकडून तेवढयाच एकूण २८६ अस्थायी पदांना मुदतवाढ मंजूरीसाठी प्रस्तावीत केले आहे.

३. सन २०११-१२ वर्षात संचालनालयाकडून प्रस्तावीत जाती प्रमाणपत्र पडताळणी साठी १७९ पदांना व दक्षता पथकासाठी १०७ पदांना अशा एकूण २८६ अस्थायी पदांना मुदतवाढ मंजूरी देण्यात येत आहे.

४. प्रमाणित करण्यात येते की, वरील अस्थायी पदे ही सहा महिन्यापेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त राहिलेली नाहीत.

५. (१) शासन निर्णय दिनांक ११.३.२००२, दिनांक २२.६.२००७, दिनांक १५.१०.२००७ व दिनांक १४.७.२००८ नुसार मंजूर करण्यात आलेल्या १५५ पदांसाठी होणारा खर्च.
२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण.
०१ - अनुसूचित जातीचे कल्याण
००१- संचालन व प्रशासन
(०१) (१) सामाजिक न्याय संचालनालय (मागासवर्ग शाखा)
(२२२५-००-९२) मागणी क्र. एन-४

(२) शासन निर्णय दिनांक १६.८.२००५ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या २४ पदांसाठी होणारा खर्च.
२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण
०१-अनुसूचित जातीचे कल्याण
००१- संचालन व प्रशासन
(०३) (०४) सामाजिक न्याय संचालनालय (मावक शाखा)
(२२२५-३४-७६) मागणी क्र. एन-४

(३) शासन निर्णय दिनांक ३ जुलै, १९९७, दिनांक ११.२.२००२, दिनांक २२.६.२००७, दिनांक १५.१०.२००७ अन्वये दक्षता पथकासाठी मंजूर करण्यात आलेल्या १०७ अस्थायी पदांसाठी होणारा खर्च.

२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण
०१-अनुसूचित जातीचे कल्याण
००१-संचालन व प्रशासन
(०३) (०४) सामाजिक न्याय संचालनालय (मागासवर्ग शाखा)
(२२२५-०११-८) मागणी क्र. एन-३

या लेखाशिर्षांतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४ ऑक्टोबर, २००४ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०११०३१६२२०७३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कि. पी. वडते )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्ग कल्याण,पुणे,
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व समाजकल्याण अधिकारी (गट-अ), जिल्हा परिषद,
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी ,
वित्त विभाग, व्यय-१४/अर्थसंकल्प-१९, मंत्रालय, मुंबई-३२,
कक्ष अधिकारी, (का.मावक-२, मावक-४ व अर्थसंकल्प) सा.न्या व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
निवड नस्ती-का. आस्था-२